**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**कै. (श्री.) प्रशांत भिमराव पाटील, सहा. शिक्षक.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२३/प्र.क्र.११/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०९ मार्च, २०२३

संदर्भ:-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र. ४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२० व दिनांक. १४.१०.२०२०.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१ /टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र. कोव्हीड-१९/कवच/ सानुग्रह/पीबीपाटील/२२-२३/टि ७/५०९, दिनांक २३/०१/२०२३.
४) तहसिलदार कार्यालय खेड यांचे क्र.फौज/कावि/७७२/२०२१, दि.०८/०४/२०२१ चे नियुक्ती आदेश.

**ज्ञापन :-**

कै.(श्री.) प्रशांत भिमराव पाटील, सहा. शिक्षक यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०१/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) प्रशांत भिमराव पाटील, सहा. शिक्षक यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु. ५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये सादर केला आहे.

३. कै.(श्री.) प्रशांत भिमराव पाटील, सहा. शिक्षक पदावर लक्ष्मीबाई दुराफे विद्यालय, आळंदी देवाची, ता.खेड, जि.पुणे येथे अनुदानित पदावर दि.२५/०९/२००० पासून कार्यरत होते.

४. कै.(श्री.) पाटील हे कोरोना विषाणू प्रादुर्भाव व प्रतिबंधात्मक उपाययोजनेच्या अनुषंगाने घरोघरी जावून नागरिकांची नोंदणी करुन घेण्याचे कामकाज केले आहे. सदर बाब तहसिलदार खेड (पुणे) यांनी दि.११/०२/२०२२ अन्वये प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) पाटील यांचा कोव्हिड-१९ मुळे दिनांक ०१/०५/२०२१ रोजी मृत्यू झाल्याचे सिटी केअर रुग्णालय, अहमदनगर यांनी दिलेल्या मृत्यू अहवालावरुन स्पष्ट होते.

६. महानगरपालिका, अहमदनगर यांचेकडील कै. (श्री.)पाटील यांचे मृत्यू प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. कै.(श्री.) प्रशांत पाटील यांनी कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती वंदना प्रशांत पाटील, (२) श्री.धैर्य प्रशांत पाटील व (३) श्री.साई प्रशांत पाटील यांना एकत्रित रु. ५०.००लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच / सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार तसेच त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०४/२०२१/व्यय ९, दिनांक २७/०५/२०२१ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, (००)(०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), (२२०२ ०४४२), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)."

८. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२३०३०९१४१२२०९९२१ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2023.03.09 14:17:08 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (माध्यमिक), पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (माध्यमिक), पुणे

**प्रत:- माहितीसाठी**

६. वित्त विभाग (व्यय ९)/(व्यय ५), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. श्रीमती श्रीमती वंदना प्रशांत पाटील, ज्ञानदीप कैवल्य, मार्कल रोड, आळंदी, आळंदी ग्रामीण खेड, पुणे ४१२१०५
९. निवड नस्ती (टीएनटी-६)(प्र.क्र. ११/२०२३).